दि.२० ऑगस्ट, २०२० हा दिवस "सद्भावना दिवस" व दि. २० ऑगस्ट, २०२० ते दि.५ सप्टेंबर, २०२० हा पंधरवडा "सामाजिक ऐक्य पंधरवडा" म्हणून साजरा करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**अल्पसंख्याक विकास विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांकः दिनवि--२०२०/ प्र.क्र.३०/२०२०/का.८**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक: १४ ऑगस्ट, २०२०.

**शासन परिपत्रक -**

युवा व क्रिडा मंत्रालय, भारत सरकार, नवी दिल्ली यांच्या निदेशानुसार दिवंगत पंतप्रधान मा.राजीव गांधी यांचा जयंती दिवस २० ऑगस्ट हा दिवस दरवर्षी "सद्भावना दिवस" म्हणून साजरा करण्यात येतो. तसेच मानव संसाधन विकास मंत्रालय, भारत सरकार यांच्या कार्यालयीन ज्ञापन क्र.एफ-२८-२२/२००६-वा.एस-४, दि.१८ जुलै, २००६ अन्वये देण्यात आलेल्या निदेशास अनुसरुन, उपरोक्त सद्भावना दिवसाच्या अनुषंगाने दि. २० ऑगस्ट, २०२० ते दि. ५ सप्टेंबर, २०२० हा पंधरवडा "सामाजिक ऐक्य पंधरवडा" म्हणून साजरा करण्याचे शासनाने ठरविले आहे. राज्यातील विविध प्रदेशातील अनेक धर्मांच्या व अनेक भाषा बोलणाऱ्या लोकांमध्ये एकमेकाविषयी ऐक्याची भावना, सौहार्द भाव वृध्दीगंत करणे व हिंसाचार टाळणे ही प्रमुख उद्दिष्टे हा पंधरवडा साजरा करण्यामागे आहेत.

२. दि. २० ऑगस्ट,२०२० हा "सद्भावना दिवस" म्हणून साजरा करण्यासाठी कोव्हीड-१९ विषाणूच्या संसर्गाची पार्श्वभूमी विचारात घेता, यावर्षी केंद्र व राज्य शासनाच्या मार्गदर्शक सुचनांनुसार खालीलप्रमाणे कार्यक्रम आयोजित करण्यात यावेत:-

अ) मंत्रालयाच्या प्रांगणात सामाजिक अंतर (social distance) चे पालन करून दि. २० ऑगस्ट, २०२० रोजी "सद्भावना दिवस" साजरा करण्यात यावा व सर्व उपस्थितांना सद्भावना दिवसाची प्रतिज्ञा घेण्यास सांगण्यात यावे. (याबाबत प्रतिज्ञेची प्रत सोबत जोडली आहे.)

ब) महसूल विभागाच्या आयुक्त/ जिल्हाधिकारी यांनी त्यांच्या कार्यालयातून Online/ लाऊड स्पिकरमार्फत सद्भावना दिवसाची प्रतिज्ञा घेण्याचा कार्यक्रम आयोजित करावा कर्मचाऱ्यांनी/अधिका-यांनी जागेवर उभे राहून/ प्रांगणात सामाजिक अंतर (social distance) चे पालन करून सद्भावना दिवसाची प्रतिज्ञा घ्यावी. (प्रतिज्ञेची प्रत सोबत जोडली आहे.)

क) कोव्हीड १९ च्या पार्श्वभूमीवर केंद्र व राज्य शासनाच्या मार्गदर्शक सुचनांनुसार सद्भावना शर्यत यावर्षी आयोजित करू नये.

ड) करोना विषाणूची पार्श्वभूमी विचारात घेता, सद्भावना दिवसाचा कार्यक्रम सामाजिक अंतर (Social distancing) संदर्भातील नियम पाळून संपन्न होईल, याची संबंधितांनी खबरदारी घ्यावी.

इ) सर्वांसाठी मास्क बंधनकारक आहे. सुरक्षित वावराच्या सर्व नियमांचे काटेकोर पालन करावे. अधिकाधिक नागरिकांना हा सोहळा घरबसल्या पाहाता यावा, यासाठी वेबसाईटव्दारे सोहळयाचे थेट प्रक्षेपण करावे.

ई) कोव्हीड १९ च्या पार्श्वभूमीवर बृहन्मुंबईत लोकांच्या विशेषत: युवकांच्या सहभागाने संचालक, सांस्कृतिक कार्य, महाराष्ट्र राज्य यांनी सद्भावना या विषयावर Online/वेबिनार (Webinar) इत्यादी व्दारा संवाद/ मार्गदर्शक कार्यक्रम आयोजित करावेत.

फ) कोव्हीड १९ च्या पार्श्वभूमीवर विद्यापीठे, महाविद्यालये आणि शाळा बंद असल्याने तेथे यावर्षी कोणतेही कार्यक्रम आयोजित करता येणार नाहीत.

उपरोक्त सर्व कार्यक्रम आयोजित करताना केंद्र व राज्य शासनाच्या कोव्हीड-१९ च्या संदर्भातील मार्गदर्शक सूचनांचे काटेकोरपणे पालन केले जाईल याची दक्षता घ्यावी.

३. याशिवाय दिनांक २० ऑगस्ट, २०२० ते ५ सप्टेंबर २०२० हा पंधरवडा "सामाजिक ऐक्य पंधरवडा" म्हणून राज्यात साजरा करण्यासाठी कोव्हीड-१९ च्या पार्श्वभूमीवर केंद्र व राज्य शासनाच्या मार्गदर्शक सूचना नुसार पुढीलप्रमाणे कार्यक्रम आयोजित करण्यात यावेत.

अ) संबंधित जिल्हाधिकारी यांनी त्यांच्या अध्यक्षतेखाली राज्यातील जिल्हा मुख्यालयात सामाजिक ऐक्याचा संदेश प्रसृत करण्यासाठी कोव्हीड १९ च्या पार्श्वभूमीवर Online/ वेबिनार (Webinar) इ.व्दारा संवाद/ मार्गदर्शक कार्यक्रम आयोजित करावेत.

ब) जिल्हाधिकाऱ्यांनी कोव्हीड १९ च्या पार्श्वभूमीवर Online/ वेबिनार (Webinar) इ.व्दारा आयोजित केलेल्या संवाद/ मार्गदर्शक कार्यक्रमां मध्ये जिल्हातील प्रख्यात स्वातंत्र्य सैनिकांना भाषण देण्यासाठी निमंत्रित करावे.

क) संचालक, सांस्कृतिक कार्य, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांनी सदर पंधरवडयामध्ये ( कोव्हीड १९ च्या पार्श्वभूमीवर ) Online/ वेबिनार (Webinar) इ.व्दारा संवाद/ मार्गदर्शक कार्यक्रम आयोजित करावेत.

उपरोक्त सर्व कार्यक्रम आयोजित करताना केंद्र व राज्य शासनाच्या कोव्हीड-१९ च्या संदर्भातील मार्गदर्शक सूचनांचे काटेकोरपणे पालन केले जाईल याची दक्षता घ्यावी.

४. उपरोक्त "सद्भावना दिवस" व "सामाजिक ऐक्य पंधरवडा" या कार्यक्रमांच्या प्रसिध्दीसाठी माहिती व जनसंपर्क महासंचालनालयाने दूरदर्शन व आकाशवाणीच्या स्थानिक अधिकाऱ्यांशीसंपर्क साधून कार्यक्रमांना पुरेशी प्रसिध्दी द्यावी.

५. कोव्हीड १९ च्या पार्श्वभूमीवर केंद्र व राज्य शासनांच्या मार्गदर्शक सूचनांचे काटेकोर पालन करून Online/ वेबिनार (Webinar) इत्यादी व्दारा जास्तीत जास्त संवाद/ मार्गदर्शक कार्यक्रम आयोजित करावे.

६. उपरोक्त कार्यक्रम यशस्वी होण्यासाठी आवश्यक त्या सर्व उपाययोजना करण्याची खबरदारी सर्व संबंधित अधिकाऱ्यांनी घ्यावी व कार्यक्रम पार पाडल्यानंतर शासनास त्याचा अहवाल सादर करावा.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.inया संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा सांकेतांक २०२००८१४१४२१५९९२१४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने.

Dinesh M.
Sonavane

Digitally signed by Dinesh M. Sonavane
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Minorities Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=9cabb099fd0576208f4caa310d2e7860201ab5363a2133e0927ff26c0f016fdf, serialNumber=6adb2bdbbd3bd651a8ade806b6e4aea66daa5512ea788889af1515751abc0181, cn=Dinesh M. Sonavane
Date: 2020.08.14 14:35:01 +05'30'

**( दि.मा.सोनवणे)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा. राज्यपाल यांचे सचिव
२) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
३) सर्व मा.मंत्री/ मा.राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
४) मा.मुख्य सचिव,
५) अपर मुख्य सचिव (का.२९),सामान्य प्रशासन विभाग,मंत्रालय,मुंबई
६) सर्व अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव /सचिव मंत्रालय,मुंबई,
७) अपर मुख्य सचिव, कृषि विभाग, मंत्रालय, मुंबई,
८) प्रधान सचिव,उच्च व तंत्रशिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई,
९) प्रधान सचिव, वैद्यकीय शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई,
१०) प्रधान सचिव,शालेय शिक्षण व क्रिडा विभाग, मंत्रालय, मुंबई,
११) प्रधान सचिव,पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई
१२) संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय,मुंबई

१३) सर्व मंत्रालयीन विभाग,

१४) सर्व विभागीय आयुक्त,

१५) कुलसचिव, सर्व विद्यापीठे,

१६) पोलीस महासंचालक,महाराष्ट्र राज्य,मुंबई

१७) पोलीस महानिरीक्षक,महाराष्ट्र राज्य,मुंबई

१८) सर्व पोलिस आयुक्त,

१९) सर्व जिल्हाधिकारी,

२०) सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद,

२१) महासंचालक,माहिती व जनसंपर्क महासंचालनालय,मंत्रालय,मुंबई (प्रसिध्दीसाठी),

२२) कक्ष अधिकारी,माहिती व तत्रंज्ञान महासंचालनालय,मंत्रालय,मुंबई (२ प्रती वेबसाईट),

२३) कक्ष अधिकारी,सामान्य प्रशासन विभाग/का.२९,मंत्रालय,मुंबई यांना कार्यक्रम आयोजनाच्या विनंतीसह,

२४) निवड नस्ती (का.८)

## सहपत्र

## सद्भावना दिवस आयोजित करण्यासाठी तपशिलवार सूचना

### SADBHAVANA DAY PLEDGE

"I take this solemn pledge that I will work for the emotional oneness and harmony of all the people of India regardless of caste, creed, region, religion or language. I further pledge that I shall resolve all differences among us through dialogue and constitutional means without resorting to violence."

*************************************************

### सद्भावना दिवस प्रतिज्ञा

मी अशी प्रतिज्ञा करतो / करते की, मी जात, वंश, धर्म, प्रदेश किंवा भाषा विषयक भेद न करता सर्व भारतीय जनतेचे भावनिक ऐक्य आणि सामंजस्य यासाठी काम करीन. मी आणखी अशी प्रतिज्ञा करतो / करते की, आमच्यामधील वैयक्तिक किंवा सामुहिक स्वरूपाचे सर्व प्रकारचे मतभेद मी हिंसाचाराचा अवलंब न करता विचार विनिमय करून व संविधानिक मार्गानी सोडवीन.

*************************************************